जिल्हा रुग्णालय अलिबाग- रायगड येथे ३०० खाटांचे इमारत बांधण्यासाठी आवारातील नेत्र कक्ष, क्षयरोग (T.B. ward) रक्तपेढी व मोटार गॅरेज इमारत निष्कासित करण्यास मान्यता देणेबाबत ...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२५/प्र.क्र. २५/आरोग्य-३अ

मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.

दिनांक : १७ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : प्रशामा-२०२४/ प्र.क्र.२७६/ आरोग्य-३अ, दि. ०६.०७.२०२४

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/ कक्ष-३/टे.६/अलिबागजुन्याइमापाडणे/९९-१००, दि. ०३.०१.२०२५.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधिन अनुक्रमांक १ येथील दिनांक ०६ जुलै, २०२४ च्या शासन निर्णयान्वये, जिल्हा सामान्य रूग्णालय अलिबाग जि. रायगड येथील इमारत जीर्ण झाल्यामुळे त्या इमारतीच्या आवारात असलेल्या जागेत नवीन जिल्हा रूग्णालयाची इमारत उभारण्यास व त्यासाठी येणा-या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदत इमारत G+७ मजल्याची आहे. सदर रूग्णालयाचे बांधकाम करताना रूग्णालयाच्या आवारात जागेची उपलब्धता नसल्यामुळे सदर आवारातील नेत्र कक्ष, मोबाईल युनिट व रक्तपेढी या छोटया इमारती पाडून सदर ठिकाणी नवीन ३०० खाटांची आंतररूग्ण इमारत प्रस्तावित आहे. अधिक्षक अभियंता सा.बा.मंडळ, कोकण भवन नवी मुंबई यांनी जिल्हा सामान्य रूग्णालय अलिबागचे बांधकाम करण्यासाठी IPHS-२०२२ च्या नियमानुसार बांधकाम करण्यासाठी जागा अपुरी पडत आहे. त्याकरीता सदर आवारात जागेची उपलब्धता नसल्यामुळे नेत्रकक्ष, मोबाईल युनिट व रक्तपेढी या छोटया इमारती पाडून सदर ठिकाणी ३०० खाटांची आंतररूग्ण इमारत बांधावयाची आहे. त्याकरीता सदर तीन इमारती राहू देणे किंवा ठेवणे सार्वजनिक हितास्तव योग्य वाटत नाही त्यामुळे वरील नमूद ३ इमारती निष्काषित करणे सार्वजनिक हित

जोपासण्याच्या दृष्टीने योग्य राहील असे प्रमाणित केलेले आहे. आता सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचा दि. ०३.०१.२०२५ च्या पत्रान्वये जिल्हा सामान्य रूग्णालय अलिबाग जि.रायगड येथील आवारातील नेत्र कक्ष, मोबाईल युनिट व रक्तपेढी या छोटया इमारती निश्कासित करण्यास मान्यता देण्याबाबतचा शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

जिल्हा सामान्य रूग्णालय, अलिबाग जि. रायगड येथे नवीन ३०० खाटांची इमारत बांधण्यास दि. ०६.०७.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर इमारतीच्या आवारात जागेची उपलब्धता नसल्यामुळे सदर आवारातील नेत्र कक्ष, मोबाईल युनिट व रक्तपेढी या छोटया इमारती पाडून त्या ठिकाणी ३०० खाटांचे नविन आंतररूग्ण इमारत बांधण्यात येणार आहे. त्याकरीता सदर इमारतीच्या आवारातील मोबाईल युनिट,नेत्र कक्ष व रक्तपेढी या छोटया इमारती निष्कासित करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | इमारतीचे नांव | इमारतीचा पी.आर.बी. क्रमांक | वर्गीकरण | बांधकामाचे वर्ष | जोते क्षेत्रफ़ळ (चौ.मी.) | इमारतीचे पुस्तक मुल्य |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | जिल्हा सामान्य रूग्णालय, अलिबाग जि. रायगड येथील आवारातील मोटार गॅरेज | ५४/३३ | अनिवासी | -- | १३.९४ | रु. १८२५.०० |
| | नेत्र कक्ष | ५४/४९ | अनिवासी | ११.०५.२००१ | ३७०.६५ | रू. ३६,४४,०२९.०० |
| | क्षयरोग कक्ष (T.B. Ward) | ५४/१६ | अनिवासी | १९४१-४२ | ८३.१६ | रू.४४१.०० |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग - पहिला, उपविभाग-एक मधील अ.क्र.०९, नियम क्रमांक ११४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१७१२२४३०८२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2025.02.17 12:25:20 +05'30'

**(अ.भि.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल १ / २, महाराष्ट्र ( लेखा व लेखापरिक्षा) / लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (१), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ,ठाणे .
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अलिबाग, जि. रायगड
९. जिल्हा शल्य चिकित्सक, अलिबाग, जि. रायगड
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२.विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती ( आरोग्य-३अ ).